**महाराष्ट्र राज्य लॉटरी**
**महाराष्ट्र गजलक्ष्मी साप्ताहिक सोडतीची बक्षिसरचना व कार्यपध्दती.**

# महाराष्ट्र शासन
## वित्त विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मरालॉ २०१७/ प्र.क्र.५८/लॉटरी २

महाराष्ट्र राज्य लॉटरी, नवीन प्रशासन भवन,
मंत्रालयासमोर, मुंबई - ४०० ०३२
तारीख: ०३ जून, २०१७

**वाचा :** १) शासन निर्णय क्रमांकः मरालॉ २०१२/प्र.क्र.४७/ लॉटरी -२,दिनांक ०८/०५/२०१२.

२) उपसंचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य लॉटरी कार्यालय, वाशी, नवीमुंबई यांचे पत्र क्र. उपसं (विवले)/ मरालॉ /योजना /१४२० /१७, दिनांक ०४/०५/२०१७.

**शासन निर्णय :**

**" महाराष्ट्र गजलक्ष्मी "** ही साप्ताहिक सोडत केंद्र शासनाचा लॉटरी (विनियमन) अधिनियम-१९९८ व केंद्र शासनाचे लॉटरी (विनियमन) नियम -२०१० मधील तरतुदींनुसार कार्यान्वित करण्यात येत आहे. महाराष्ट्र गजलक्ष्मी ही सोडत दिनांक ०६/०८/२०१७ रोजी सायंकाळी ४.४५ वाजता काढण्यात येईल. तसेच ही सोडत पुढेही चालू ठेवण्यात येईल.

२. या सोडतीच्या तिकिटाचे मूल्य **रु.२०/-** असून प्रत्येक मालिकेत १०,००० तिकीटे असलेल्या **५** मालिकांत एकूण **५०,०००** तिकीटे मुद्रीत करण्यात येतील. या सोडतीतील प्रत्येक मालिकेमध्ये तिकीटांचे क्रमांक ०००० ते ९९९९ या प्रमाणे असतील. या सोडतीमध्ये सर्व मालिका मिळून **पहिले बक्षिस रू. १० हजारची २५ बक्षिसे** ठेवण्यात येत आहे.

३. " महाराष्ट्र गजलक्ष्मी " सोडतीची तिकीटे उपसंचालक (वि. व ले.), महाराष्ट्र राज्य लॉटरी, १ला मजला, वाय-अे १, अतिरिक्त शॉप कम गोडाऊन, ए.पी.एम.सी. मार्केट,सेक्टर १९-बी, वाशी,नवीमुंबई-४००७०५ यांचे कार्यालयातून सर्व विक्रेत्यांना उपलब्ध होतील. या बक्षिसरचनेतील रु.१०,०००/- व त्याखालील असणाऱ्या सर्व बक्षिसांचे प्रदान केल्याबद्दल विक्रेत्यांना २ % सेवाआकार देण्यात येईल.

४. या सोडतीची तिकीट विक्री करताना महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या तिकीट विक्रेत्यांना प्रोत्साहन देण्यासाठी या तिकीट विक्रीच्या १०० तिकीटांचे एका पुस्तकावरील (M.R.P. Rs.२०/- each ticket) तिकीटांच्या दर्शनी किंमतीवर खरेदी करण्यात आलेल्या या सोडतीच्या एकूण लॉटरी तिकीटांवर पुढीलप्रमाणे घाऊक सूट (Discount) देण्यात येईल.

<table>
<tr><td>अ.क्र.</td><td>तिकीटांची संख्या</td><td>घाऊक सूट</td><td rowspan="5">जे अभिकर्ते २५% पेक्षा अधिक तिकीटे खरेदी करतील त्या अभिकर्त्यांना देण्यात येणाऱ्या २% विशेष सूटीबाबतच्या अटी व शर्ती, शासन निर्णय वि. वि. क्र. मरालॉ २०१२/प्र.क्र.४७/ लॉटरी -२, दिनांक ०८/०५/२०१२ नुसार लागू राहतील.</td></tr>
<tr><td>१</td><td>५०० ते १०,५००</td><td>२० %</td></tr>
<tr><td>२</td><td>१०,५०१ ते २०,५००</td><td>२२ %</td></tr>
<tr><td>३</td><td>२०,५०१ ते २५,५००</td><td>२४ %</td></tr>
<tr><td>४</td><td>२५,५०१ ते ५०,०००</td><td>२८ %</td></tr>
</table>

**५.** या सोडतीच्या तिकीट छपाईचे आदेश उपसंचालक (वि. व ले.), महाराष्ट्र राज्य लॉटरी कार्यालय, वाशी, नवीमुंबई यांचेकडून स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येतील. या सोडतीची तिकीट छपाई मे. साई सिक्युरिटी प्रिंटर्स प्रा. लि., फरीदाबाद यांचेकडून करून घेण्यात येईल. या तिकीटाचे आकारमान २० x१० cms असून यासाठी कागदाचा दर्जा ९० GSM Croma Art Paper वापरण्यात येऊन त्याचा दर रू. २२४ .४०/- प्रती चौ. से.मी. प्रती लाख असा राहील.

**६.** घाऊक अभिकर्त्याने ज्या किरकोळ अभिकर्त्यांस तिकीटे विकली असतील त्या किरकोळ अभिकर्त्यांची यादी (तिकीटांच्या क्रमांकासह) घाऊक अभिकर्त्यांने पुढील तिकीट खरेदीच्यावेळी महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या उपसंचालक (वि. व ले.), वाशी, नवीमुंबई या कार्यालयात सादर करणे बंधनकारक आहे.

**७.** या साप्ताहिक सोडतीची बक्षिसरचना पुढीलप्रमाणे राहील.

**महाराष्ट्र गजलक्ष्मी साप्ताहिक सोडत**

मालिका : ५
तिकीटांचे क्रमांक: ०००० ते ९९९९
सोडत दिनांक : ०६ऑगस्ट,२०१७ पासून,
वेळ: रविवार, सायं. ४.४५ वा.

प्रत्येक मालिकेत: १०,००० तिकीटे
एकूण तिकीटे : ५०,०००
तिकिटांची किंमत : २०/-

| बक्षिसे | बक्षिसाची रक्कम | प्रत्येक मालिके तील बक्षिसांची एकूण संख्या | सर्व मालिकां - तील बक्षिसांची एकूण संख्या | सर्व मालिकांतील बक्षिसांची एकूण रक्कम |
|---|---|---|---|---|
| पहिले बक्षिस ५ (पूर्ण क्रमांक) प्रत्येक मालिकेसाठी | १०,००० | ५ | २५ | २,५०,००० |
| दुसरे बक्षिस (पूर्ण क्रमांक) प्रत्येक मालिकेसाठी | २,००० | १ | ५ | १०,००० |
| तिसरे बक्षिस (पूर्ण क्रमांक) ( प्रत्येक मालिकेसाठी ) | १,००० | १ | ५ | ५,००० |
| चौथे बक्षिस (पूर्ण क्रमांक) १० जुळवण्या | ५०० | -- | ५० | २५,००० |
| पाचवे बक्षिस (पूर्ण क्रमांक) १० जुळवण्या | २०० | -- | ५० | १०,००० |
| सहावे बक्षिस (कोणत्याही ४ अंकावर काढण्यात येणाऱ्या क्रमांकास व त्या क्रमांकाच्या पुढील तसेच | १०० | -- | ५०० | ५०,००० |

| बक्षिसे | बक्षिसाची रक्कम | प्रत्येक मालिके तील बक्षिसांची एकूण संख्या | सर्व मालिकां - तील बक्षिसांची एकूण संख्या | सर्व मालिकांतील बक्षिसांची एकूण रक्कम |
|---|---|---|---|---|
| मागील प्रत्येकी १०० व्या क्रमांकांस ) | | | | |
| सातवे बक्षिस (कोणत्याही ४ अंकावर काढण्यात येणाऱ्या क्रमांकास व त्या क्रमांकाच्या पुढील तसेच मागील प्रत्येकी २० व्या क्रमांकांस.) | ५० | -- | २५०० | १,२५,००० |
| **एकूण** | | | **३,१३५** | **४,७५,०००** |

८. **<u>सोडतीची कार्यपध्दती :-</u>**

**" महाराष्ट्र गजलक्ष्मी "** या साप्ताहिक सोडतीकरीता सोडतीचे ठिकाणी ठळकपणे दिसतील अशा ठिकाणी ४ ड्रम ठेवले जातील. प्रत्येक मालिकेमध्ये ०००० ते ९९९९ असे तिकीटांचे क्रमांक असतील. सर्व ड्रममध्ये ० ते ९ अंकाची प्रत्येकी एक चकती याप्रमाणे दहा चकत्या टाकण्यात येतील. पंचमंडळाच्या समोर प्रत्येक चकती प्लॅस्टिक/रबरी आवरणात (पिशवीत) ठेवली जाईल. त्यामुळे चकतीवरील अंक दिसणार नाही. पंचमंडळाच्या अध्यक्षांनी घंटी वाजविल्यावर सर्व ड्रम एकाच वेळी फिरविले जाऊन सोडतीची सुरुवात होईल. अध्यक्षांनी पुन्हा घंटी वाजविल्यावर सर्व ड्रम एकाच वेळी फिरवायचे थांबविले जातील. त्यानंतर प्रत्येक ड्रममधून एक पिशवी काढून त्यातील चकतीवरील अंक पंचांना दाखविला जाईल. अध्यक्ष तो अंक घोषित करतील. अंक ज्या क्रमाने निघतील त्या क्रमाने फलकावर प्रदर्शित केले जातील.

८.१ **<u>पहिले बक्षिस रू.१०,०००/-</u>** पहिल्या रू. १०,०००/- च्या बक्षिसासाठी पूर्ण अंकाचे ५ भाग्यवान क्रमांक प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्ररित्या निश्चित करण्यात येतील. असे भाग्यवान क्रमांक रू.१०,०००/- च्या पहिल्या बक्षिसासाठी पात्र असतील.

८.२ **<u>दुसरे बक्षिस रू. २,०००/-</u>** दुसऱ्या रू. २,०००/- च्या बक्षिसासाठी पूर्ण अंकाचा १ भाग्यवान क्रमांक प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्ररित्या निश्चित करण्यात येईल. असा भाग्यवान क्रमांक रू.२०००/- च्या दुसऱ्या बक्षिसासाठी पात्र असेल.

८.३ **<u>तिसरे बक्षिस रू. १,०००/-</u> तिसऱ्या** रू. १,०००/- च्या बक्षिसासाठी पूर्ण अंकाचा १ भाग्यवान क्रमांक प्रत्येक मालिकेसाठी स्वतंत्ररित्या निश्चित करण्यात येईल. असा भाग्यवान क्रमांक रू.१०००/- च्या तिसऱ्या बक्षिसासाठी पात्र असेल.

८.४ **<u>चौथे बक्षिस रू. ५००/-</u>** चौथ्या रु.५००/- च्या बक्षिसासाठी पूर्ण अंकाची एक जुळवणी अशा १० जुळवण्या काढण्यात येतील. ज्या तिकीटांच्या शेवटी अशा अंकाची जुळवणी आली असेल, अशा सर्व मालिकेतील तिकीटे रू.५००/- च्या चौथ्या बक्षिसासाठी पात्र असतील.

८.५ **पाचवे बक्षिस रू. २००/-** पाचव्या रु. २००/- च्या बक्षिसासाठी पूर्ण अंकाची एक जुळवणी अशा १० जुळवण्या काढण्यात येतील. ज्या तिकीटांच्या शेवटी अशा अंकाची जुळवणी आली असेल, अशा सर्व मालिकेतील तिकीटे रू.२००/- च्या पाचव्या बक्षिसासाठी पात्र असतील.

८.६ **सहावे बक्षिस रू. १००/-** सहाव्या रू. १००/- बक्षिसासाठी पूर्ण अंकाचा एक क्रमांक काढण्यात येईल. त्या क्रमांकास व त्या क्रमांकाच्या पुढील तसेच मागील येणाऱ्या प्रत्येकी १०० व्या क्रमांकांस रू.१००/- चे सहावे बक्षिस सर्व मालिकांसाठी देण्यात येईल.

८.७ **सातवे बक्षिस रू. ५०/-** सातव्या रू. ५०/- बक्षिसासाठी पूर्ण अंकाचा एक क्रमांक काढण्यात येईल, त्या क्रमांकास व त्या क्रमांकाच्या पुढील तसेच मागील प्रत्येकी २० व्या क्रमांकास रू.५०/- चे सातवे बक्षिस सर्व मालिकांसाठी देण्यात येईल.

९. या सोडतीच्या तिकीट छपाईचा खर्च मागणी क्र. जी -२, २०७५, संकीर्ण सर्वसाधारण सेवा (००) १०३ राज्य लॉटरी, लॉटरी संचालनालय (२०७५० ४७२) (००) (०१) प्रमुख लॉटरी १६ - प्रकाशने व बक्षिस विजेत्या तिकीटांचा खर्च मागणी क्र. जी -२, २०७५, संकीर्ण सर्वसाधारण सेवा (००) १०३ राज्य लॉटरी, लॉटरी संचालनालय (२०७५० ४७२) (००) (०१) प्रमुख लॉटरी ०५ बक्षिसे या लेखाशिर्षामधील चालू आर्थिक वर्षात उपलब्ध तरतूदींतून भागविण्यात यावा.

**१०.** पंचमंडळाचे सदस्य त्यांना पुरविलेल्या बक्षिस विजेत्या क्रमांकाच्या नोंदवहीत विजेत्या क्रमांकाची नोंद करुन घेतील व त्या प्रतीवर सही करतील आणि ती प्रत निकालाच्या अभिलेखाची विश्वसनीय प्रत म्हणून ठेवली जाईल.

**११.** या सोडतीमध्ये कोणत्याही मालिकेमध्ये एकापेक्षा जास्त भाग्यवान क्रमांक निश्चित करताना एखादा क्रमांक पुन्हा आल्यास तो रद्द करुन त्या ऐवजी पुन्हा नवीन भाग्यवान क्रमांक निश्चित करण्यात येईल.

**१२.** या सोडतीतील बक्षिस विजेत्याने कोणत्याही बक्षिसाची मागणी करताना त्यास मूळ तिकीट शासनाकडे सादर करणे बंधनकारक राहील, तसेच कोणत्याही तिकीटांवर एकाच बक्षिसाची मागणी करता येईल.

**१३.** महाराष्ट्र राज्य लॉटरीच्या कोणत्याही सोडतीमधील एखाद्या बक्षिसाकरिता एकापेक्षा जास्त पूर्ण भाग्यवान क्रमांक किंवा जुळवण्या काढण्यात येत असतील अशावेळी कोणत्याही क्रमांकाची त्याच मालिकेत पुनरावृत्ती झाल्यास किंवा दोन्ही क्रमांक /एकापेक्षा जास्त क्रमांक सारखे आल्यास नंतर काढलेले क्रमांक रद्द करून त्याऐवजी नवीन क्रमांक काढण्यात येतील.

**१४.** वर नमुद केल्याप्रमाणे या सोडतीमधील बक्षिस विजेत्या तिकीटाचे क्रमांक निश्चित करण्यासाठी ड्रम किंवा विजेवर चालणारी व चक्रावर क्रमांक लावलेली (ड्रॉ मशीन) सोडत यंत्र, वा त्याचप्रमाणे सोडत जलद काढण्याच्या शासनाच्या दृष्टीने योग्य पद्धतीचा अवलंब सोडत काढताना करण्यात येईल.

**१५.** सदरच्या सोडती कार्यपध्दती पूर्ण झाल्यानंतर शासनाच्या विहित तरतूदीं / कायद्यानुसार या सोडतीच्या निकालाची प्रसिध्दी शासनाच्या राजपत्रात करण्याची कार्यवाही उपसंचालक (वि.वले.), महाराष्ट्र राज्य लॉटरी, वाशी, नवीमुंबई या कार्यालयाकडून करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६०७१५०६१२१९०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Madhav Kundalik Avhad

Digitally signed by Madhav Kundalik Avhad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=33f159af855e668523427acf7322c4c3427aed8bf6b0bf7eb4dfdd5490c3d843, cn=Madhav Kundalik Avhad
Date: 2017.06.07 15:09:41 +05'30'

**( माधव आव्हाड़ )**

कक्ष अधिकारी तथा राज्य लॉटरी अधिकारी

**प्रति,**

१) मा. मंत्री ( वित्त), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
२) मा. राज्यमंत्री (वित्त), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
३) अपर मुख्य सचिव, (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४) अपर मुख्य सचिव, (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५) अपर मुख्य सचिव, (गृह),गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) आयुक्त, अल्पबचत व राज्य लॉटरी, मुंबई-३२.
७) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८) संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई-२१.
९) महालेखापाल, महाराष्ट्र १/२(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई-३२.
११) उप सचिव (राज्य लॉटरी) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई-५१.
१३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१४) उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य लॉटरी,वाशी, नवीमुंबई.
१५) कक्ष अधिकारी, प्रशा-४/लॉटरी-३/ लेखाधिकारी, अर्थ संकल्प (लॉटरी संचालनालय, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१६) निवड नस्ती, लॉटरी -२.